**राज्य माहिती आयोग (मुख्यालय ) कार्यालयामध्ये**
**<u>नवीन डीजीटल ईपीएबीएक्स यंत्रणा बसविणेबाबत</u>**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- रामाआ -२०११/१४०/प्रक्र ७७ / ११/सहा,**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांक- ४ /१०/२०११**

पहा:- १) राज्य माहिती आयोग (मुख्यालय ), मुंबई यांचे दि.१५ मार्च,२०११ चे पत्र.

**प्रस्तावना:-**

राज्य माहिती आयोग (मुख्यालय ) मुंबई यांचे कार्यालयाच्या वापरातील इंटरकॉम यंत्र कालबाह्य झाल्यामुळे इंटरकॉम यंत्रणा वारंवार बंद पडत आहे. यंत्रणा खराब / बंद झाल्यामुळे दूरध्वनी हस्तांतर (Transfer ) करणे तसेच दूरध्वनी चालू असताना वारंवार खंडीत होणे इ. अडचणी येत असल्याचे आयोगाने संदर्भाधीन पत्रान्वये कळविले आहे. आयोग कार्यालयाच्या कामकाजाचा संबंध सर्वसामान्य जनतेशी असल्याने कार्यालयाच्या कामकाजामध्ये अडचणी येत आहेत. यासाठी नवीन डिजीटल यंत्रणा आयोग कार्यालयामध्ये बसविण्यासाठी शासनाची मंजूरी देण्याची बाब विचाराधीन होती. याबाबत खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

राज्य माहिती आयोग (मुख्यालय), मुंबई कार्यालयामध्ये नवीन डीजीटल ईपीएबीएक्स यंत्रणा बसविण्यासाठी येणा-या रू. ८३,९१० /- (रु. त्र्याऐंशी हजार नऊशे दहा फक्त ) इतक्या खर्चास याद्वारे शासनाची प्रशासकिय मान्यता देण्यात येत आहे.

२. हा खर्च "मागणी क्र.ए-४,२०७०- इतर प्रशासनिक सेवा, ००.८००-इतर खर्च, (००) (०९) राज्य माहिती आयोग (२०७० ०७८ २), १३ कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षासाठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. नवीन डीजीटल ईपीएबीएक्स यंत्रणा बसविण्यासाठी शासनाच्या दर करारावर असलेल्या संस्थेमार्फत काम करून घेण्यात यावे व याबाबत शासनाच्या प्रचलीत अटी व शर्तीचे काटेकोर पालन होईल याची दक्षता घेण्यात यावी.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र ६४४/११/ व्यय-४, दि.१७ सप्टेंबर, २०११ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१११००३१४५३३१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(रा.शि.अरवारी )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति:-**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व हक्कदारी) महाराष्ट्र- २, नागपूर,

C:\Documents and Settings\Valued Acer Customer\Desktop\milind61

३) महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.

४) महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र -२, नागपूर,

५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ( २ प्रती )

६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई (२ प्रती )

७) सचिव, राज्य माहिती आयोग महाराष्ट्र राज्य,मुंबई (५ प्रती )

८) वित्त विभाग,व्यय-४

९) सामान्य प्रशासन विभाग/ का.२५

१०) निवड नस्ती कार्यासन-सहा.